ई - साहित्य प्रकाशन

२९-१२-२००६





## संपादकीय

नमस्कार! हाय, हेलो  फ्रेंड्स!!

म्हणता म्हणता वरीस सरलं,
दान प्रेमाच देऊन गेलं,
येईल नवलाई सांगून गेलं,
लाख आशिष देऊन गेलं!!

सरत्या वर्षाला निरोप देताना येणारे आठव आणि दुरून खुणावणारे नवे दिवस, नव्या आशा.

तसच "नेटाक्षरीच" पण हे नाविन्य, सतत वेगळ द्यायच.

नव्या वर्षाच्या स्वागताला सज्ज होऊया,
या अंकासोबत!!!

नविन वर्षाच्या आपणा सर्वांना
हार्दीक शुभेच्छा !!!!

**संपादक मंडळ**

**संपादक -**

- सोनाली घाटपांडे ( पुणे )

**अतिथी संपादक -**

- सारंग भणगे ( पुणे )

**सहसंपादक -**

- स्वप्ना कोल्हे ( नाशिक )
- रेणूका रेपाळ (अमेरिका )
- सुरुची नाईक ( नागपूर )
- आनंद माने ( सोलापूर )
- नाम गुम जायेगा ( ठाणे )

**अनुदिनी रुपांतर -**

- सचिन काकडे





*हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..*
**netaksharee@gmail.com**

# नेटाक्षरी

## नवं वर्ष .... नवा क्षण !

कमलदलावरून निसटणारा जलबिंदू सहसा
त्या तलावातच लुप्त होतो -----
ज्यातून तो आला होता.

प्रत्येक संपणारं वर्ष, महिना, दिवस, क्षण
देखिल असेच मिसळून जातात -------
त्या अथांग कालप्रवाहात.

हे जाणूनही, नव्या, चकाकत्या बिंदूची
ओढ असतेच आपल्याला ---------
जेव्हा विराजमान होतो तो जीवन – दलावर !

स्फ़टीक निरीक्षण करणा-या
गूढ जीप्सी भविष्यवेत्तीप्रमाणे
त्या थेंबाला निरखत रहातो आपण -----

नी कळतच नाही, की
जुना थेंब घरंगळून
नव्याने त्याची जागा कधी घेतली ते ........

- प्रभा प्रभुदेसाई.

## नवा हा दिन, वर्ष हे नवे

नवी ही पहाट, दिशा ही नव्या
नवी ही उमेद, आशा ही नव्या
नववर्षाच्या दंवात उमलत्या
स्वप्नांच्या भाषा ही नव्या

नवे हे किरण, क्षण हे नवे
नवा हा विश्वास, श्वास ही नवे
नववर्षाच्या रंगात रंगते
जीवनाचे चित्र हे नवे

नवा आसमंत, क्षितीज ही नवे
नवे हे स्वर, गीत ही नवे
नववर्षाच्या सुरात मिसळते
अंतरातले हे नाद नवे

नवा हा हर्ष, स्पर्श हा नवा
नवा उत्साह, नवी ही हवा
नववर्षाच्या स्वागतात दरवळता
शब्दांच हा गंध नवा .....

- सचिन काकडे.



## ।। आयुष्यावर बोलू काही ।।

आयुष्याच्या  वाटेवर चालताना
साथ कोणाचीतरी हवी असते
प्रवास जरी एकट्याचा असला
तरी सोबत मात्र हवी असते !!!

आयुष्य तेच आहे
आनंदाने जगायच
विखूरलेल्या फुलांना
एक गुच्छ बनवायच  !!!

- निलेश लोटणकर



शेवटी जीवन हे असच असत
देवाने दिलेल अनमोल रत्न असत
त्या रत्नांना जपायच असतं
अनेक रत्नांना वाढ्वायच असतं

मी तुला पाहिल्यावर
इंडीकेटर पहायच विसरलो
जायच होत अंबरनाथला
चुकून ठाणे लोकलमध्ये बसलो !!!

- अमित म्हात्रे

आईची ममता तशी
कोणालाच मापता येणार नाही
फक्त ममतेच्या सरी झेलाव्यात
इतकं सुख स्वर्गही देणार नाही !!!

- सनिल पांगे

प्रेम म्हटल की असचं असत
वाट्ते चंद्र तारे तोडून आणावे
माझ्याहून जास्त प्रेम कोणी करू
शकत नाही
प्रियेने हेच जाणावे !!!

- नितीन

मेंदू व मन ह्यांच्यात
पटण फार अवघड आहे
कारण एकासाठी उतरण
दुस-यासाठी चढण आहे !!!

- सनिल पांगे



## वर्ष सरलं तरी

वर्ष सरलं तरी,
जखमा भरल्या नाहीत
नव्या जखमांना शरीरावर
जागाही उरली नाही
अश्रु आटून गेले
आता भावनाही संपल्या
तरीही का ह्या वेदना
मनात आहे गुंफ़ल्या?
व्यवहारी झालोय मी आता
व्यवहारी जीवन जगतोय
मनातल्या आठवणींचा कप्पा
क्वचितच उघडुन बघतोय
का हा बदल माझ्यात?
का बदललंय सगळच वातावरण
धुमसत का राहत अजूनही
पेटलेल्या मनाचं सरण
नवी पहाट दूर करेल हा काळोख
का वाढत जाईल हा काळोख?
नाही!
प्रकाशाच्या शक्तिने काळोखी भीतीला
पाडेल एक खिंडार...
कोंडलेल्या श्वासाला मिळावे
आता सुस्कारे आकाशाचे
मनाला लाभावे नवचैतन
सळसळणा-या रक्ताचे
सतारीवर छेडावे आता
स्वर नव्या भूपाळीचे
चिकारीही झंकारत याव्या
घेऊन स्वरगालीचे
विदीर्ण झालेल्या मनाला
फ़ुटावी पालवी नवी
सरत्या वर्षाने गावी
ह्या आसवांची भैरवी.

- कौस्तुभ नाईक



## नववर्षाच्या आभाळभर शुभेच्छा !!

नवनव वर्ष,
उमलता हर्ष
चंदेरी स्वप्नांचा होऊ दे
सोनेरी उत्कर्ष

जवळच आहे आकाश
चल हात लावनू येऊ
अवघ्या या जगाला
पाऊलभर करून येऊ

ढिगभर असोत चिंता
घाल त्यांना चुलीत
हर सकाळ यावर्षी
साजरी करू अस्खलीत

- अभिजीत गलगलीकर







## ट्रीपल फ़िल्टर

प्राचीनकाळी ग्रीस मध्ये जन्मलेल्या सौक्रेटीस ला एक सर्वोत्तम विचारवंत मानलं जायचं.

एके दिवशी त्याचा एक शेजारी त्याच्याकडे आला.त्याने सौक्रेटीस ला विचारलं, " तुला माहीतीय मी आज तुझ्या मित्राबद्दल काय ऎकलं ?"

"एक मिनीट थांब" सौक्रेटीस म्हणाला , " मला माझ्या मित्राबद्दल काही सांगण्यापुर्वी तुला एका कसोटीत खरं उतरावं लागेल , मी तिला 'ट्रीपल फ़िल्टर टेस्ट' म्हणतो"

"ट्रीपल फ़िल्टर ?"

" हो" सौक्रेटीस पुढे म्हणाला " तू माझ्या मित्रांबद्दल काही सांगणार असशील तर तुला या ट्रीपल फ़िल्टर मधून जावंच लागेल, पहिलं फ़िल्टर आहे सत्य , तू माझ्या मित्राबद्दल मला जे काही सांगणार आहेस ते अगदी संपुर्णपणे सत्य आहे , यावर तुझा विश्वास आहे ?"

"नाही , मी फ़क्त असं ऎकलं" शेजारी म्हणाला

"ठीक आहे, म्हणजे तुला नक्की माहीत नाही, तू सांगणार आहेस ते सत्य आहे अथवा नाही , आपण दुसरं फ़िल्टर वापरूया , तू जे सांगणार आहेस ते माझ्या मित्राच्या भल्याचं आहे ?"

"नाही, या उलट ते..."

" बरं, म्हणजे तू मला माझ्या मित्राबद्दल काही सांगणार आहेस जे त्याच्या भल्याचं नाही, आणि ते खरं आहे याची शाश्वती नाही, तरीही तू ही कसोटी पार करू शकतोस , तिसरं फ़िल्टर अजून बाकी आहे , मला सांग तू जे मला सांगणार आहेस त्या गोष्टीचा मला काही लाभ आहे ?"

"नाही , तसं काही नाही...."

"जर तू मला जे सांगणार आहेस ते सत्य नसेल , माझ्या मित्राच्या भल्याचं नसेल आणि मला त्यातून काही फ़ायदा ही नसेल तर मला सांगतोसच कशाला ?"

***आणि म्हणूनच सौक्रेटीस ला विचारवंत मानलं जातं***







## सालाबाद

जन्मोजन्मीपासून मला मुखवट्याचे वाटे अप्रूप
आरश्याला बोल लावला जेव्हा दिसला चेहरा विद्रूप
नियतीचे दोष मोजत पाट्या टाकून बसायच
सालाबाद्प्रमाणे यंदाही आयुष्याशी भांडायच

कधीतरी डोळ्यात खुपत खपाटीच पोट
आमची दुखते दाढ तिला दोनशेची नोट
सेन्सेक्सच्या गप्पा मारत एसीत गार व्हायच
सालाबाद्प्रमाणे यंदाही आयुष्याशी भांडायच

कधीच जुळवून घेत नाहीत तत्व आणि खिसा
पार्टटाईम नैतिकतेचा घेतलाय आम्ही वसा
काखोटीला वास्तव मारून सार्थक झाल समजायच
सालाबाद्प्रमाणे यंदाही आयुष्याशी भांडायच

दरवर्षी तोच संकल्प नविन वहित लिहू
दरवर्षी त्याच खड्ड्यात वृक्षारोपण करू
नैतिकतेचे हफ्ते नेमाने चुकवत रहायच
सालाबाद्प्रमाणे यंदाही आयुष्याशी भांडायच

पडक्या दातानो गीता वाचा तेव्हढ्च पुण्याच तारण
तत्वांवर गप्पा मारायला होईल तेव्हढच कारण
नामापेक्षा जपमाळेला १०८वेळा  कुरवाळायच
सालाबाद्प्रमाणे यंदाही आयुष्याशी भांडायच

- चिराग पत्की

अतिथी संपादकांची ओळख –

**सारंग भणगे**



स्वतःबद्दल सांगताना सारंग म्हणतो "पहिली कविता मझ्या आठवणीप्रमाणे शाळेमध्ये असताना केली. मग अशाच अधुन मधुन करीत राहिलो; कधी आपोआप स्फुर्ती मिळे; तर कधी काही प्रसंगांमुळे. पण प्रकर्षाने आठवते ते म्हणजे, परीक्षेच्या काळात हमखास कविता सुचत; जरा जास्तच. किंबहुना, मला माझी सर्वात पहिली आवडलेली कविता ही परीक्षेवरचीच होती.

आयुष्याच्या काव्यप्रवासात सर्वात अमुलाग्र आणि क्रांतीकारी बदल घडला; जेव्हा 'मराठी कविता' समूहाचा सभासद झालो. कविता करायला; सांगायला, बोलायला एक छानसं व्यासपीठच मिळालं जणू. त्या आधी कधी सहसा कुणाला कविता करतो वगैरे कधी सांगितले नाही. पण इथे सगळे आपल्यासारखेच असल्यामुळे, मनमोकळेपणाने कविता टाकू लागलो.

काही विशिष्ट व्यक्तींनी सुरुवातीला खुप प्रोत्साहन दिले. आणि मग कवितेचा एक वेगळाच आनंदप्रवास सुरु झाला. मनावर कवितेचे पक्षी सुंदर नक्षी सतत कोरू लागले, कवितेचे खग मुक्त विहरू लागले.

आज या काव्यवेडाचे श्रेय 'मराठी कविता' आणि 'काव्यांजली' ला देतो. माझ्याप्रमाणेच अनेकांना अशाच त-हेने साहित्यसेवा करायची; आणि सर्वांमध्ये साहित्यमेवा लुटायची स्फुर्ती लाभो, अशी माझी मनोकामना आहे"

कायद्याचा पदवीधर असलेला सारंग काही वर्ष वकिलीचा व्यवसाय करून आता आस्थापनांच्या विधी विभागामध्ये काम करतो.




**अतिथी संपादकांच्या लेखणीतून**

**नवसंवत्सर**

नाचत आले नवसंवत्सर
आशांची नि सुंदर झालर
पहात उभा या उंबरठ्यावर
दृष्य उद्याचे रम्य मनोहर.

भुतकाळाची भुते नाचती
घटित संकटे विकट हासती
चित्र उद्याचे धूसर दिसती
परी पाऊले पुढेच पडती.

नवी बिगुले नवे शंखरव
नव्या रणांगणी युद्ध पुनरव
नव्या चाहुली नवे पदरव
नवे सोबती नवी गुंजारव.

नवी क्षितीजे नवी भरारी
नवीन उर्जा नवी उभारी
नव्या उद्याची नवी खुमारी
नवीन तृष्णा नवीन विहीरी.

जुने जुने ही नवे नवे
नवे नवे ते हवे हवे
नवलाईच्या स्वप्नासवे
नूतन गीत नित्य गावे.

- सारंग भणगे.



## नूतन वर्षाभिनंदन २००९

नका विचारू  गत वर्षाने काय दिले
अहो सोन्यासारखे मित्र दिले
आनंद ओसंड्णारे क्षण दिले
हसरे कधी बोचरे ॠतू दिले

निरोप देऊया अशा गतवर्षाला
नाही विसरणार सांगू तयाला
सज्ज व्हा नूतन वर्ष स्वागताला
संकल्प करूया, या नविन वर्षाला

न पळणार आम्ही भौतिक सुखाकडे
टाकू  पावले परदु:ख हलके करण्याकडे

पहिली सकाळ आनंदरश्मी उधळेल
स्वागत करताना मन नाहून निघेल
सृष्टी आनंदसुमनांची उधळण करेल
नूतन वर्षी तुम्हा मित्रांची प्रित बहरेल

नविन वर्षाच्या हार्दीक शुभेच्छा  !!!!!

- अरविंद चौधरी (सतस्वरूपी राम)

